आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या वर्षाकरीता केंद्र पुरस्कृत सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजनेसाठी निधी वितरण.
(केंद्र हिस्सा - २४०१ बी ३५७)
(राज्य हिस्सा - २४०१ बी ३६६)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः बीयुडी-२०२१/प्र.क्र.७/कार्यासन ६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: - २८ मार्च, २०२२.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१, दि.१४.१०.२०२१, दि.०३.०२.२०२२ व दि.१७.०३.२०२२.
२) आदिवासी विकास विभाग, शा. नि.क्र. बीयुडी-२०२१/प्र.क्र. ७/कार्यासन-६, दि.२८.७.२०२१ व दि.१६.२.२०२२.
३) केंद्र शासन, कृषी मंत्रालय यांचे पत्र क्र. FM-११/६०/२०२१-FME. Dt.१७.१२.२०२१. व FM-११/६०/२०२१-FME-Part (२), Dt.२१.१२.२०२१.
४) कृषि व पदुम विभागाची नस्ती क्र.प्रअयो-२०२१/प्र.क्र. १०९ (भाग-१)/कार्या-९ अे.

**प्रस्तावना :-**

कृषी व पदुम विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या केंद्र पुरस्कृत सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग या योजनेतील अनुसूचित जमाती घटकासाठी सन २०२१-२२ मध्ये प्राप्त झालेला पहिल्या हप्त्याचा दुसऱ्या टप्प्यातील केंद्र हिस्सा रु.१७.२७५७८ लाख व समरुप राज्य हिस्सा रु.११.५१७१९ लाख इतका निधी, सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीत तरतुदींतून वितरीत करण्याबाबत संदर्भाधीन क्र.४ अन्वये प्रस्ताव सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष, २४०१- पीक संवर्धन या मुख्य लेखाशीर्षाखाली वित्त विभागाने मान्यता दिल्यानुसार केंद्र पुरस्कृत सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजनेच्या सन २०२१-२२ मध्ये प्राप्त झालेला केंद्र हिस्सा रु.१७.२७५७८ लाख व समरुप राज्य हिस्सा रु.११.५१७१९ लाख असा एकूण रु.२८.७९२९७ लाख इतका निधी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून पुढीलप्रमाणे वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

(रु.लाखात)

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष व केंद्र / राज्य हिस्सा | बाब | सन २०२१-२२ मधील अर्थसंकल्पीत तरतूद | वितरीत तरतूद | शिल्लक निधी | या शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ (४-५) | ७ |
| सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना | २४०१ बी ३५७ केंद्र हिस्सा (६० टक्के) | ३३, अर्थ सहाय्य | ५३३.८० | २५१.५७ | २८२.२३ | १७.२७५७८ |
| | २४०१ बी ३६६ राज्य हिस्सा (४० टक्के) | | ३५५.८७ | २६.५५ | ३२९.३२ | ११.५१७१९ |
| **एकूण** | | | **८८९.६७** | **२७८.१२** | **६११.५५** | **२८.७९२९७** |

२. उपरोक्त प्रमाणे एकूण **रु. २८.७९२९७ लाख (अक्षरी रुपये अठ्ठावीस लाख एकोणऐंशी हजार दोनशे सत्याण्णव फक्त)** इतका निधी प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून सचिव, कृषी व पदुम विभाग यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ च्या शासन आदेशातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. त्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित विभागाची राहील.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.२६२/व्यय-१४, दि.२२.०३.२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२४१२३६१४५४२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613, serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2022.03.28 17:41:09 +05'30'

**(रविंद्र दि.औटे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव (कृषि) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य,पुणे.
५. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
७. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
८. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
९. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१०. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.